जनहित याचिका क्रमांक १०३/२०११ मधील मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने ग्रामपंचायतीच्या हद्दीत/जिल्हा परिषदेच्या हद्दीत राष्ट्रध्वजाबाबत घ्यावयाची खबरदारी.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: रिटपी-२६१३/प्र.क्र.८६/पंरा-४,**
**बांधकाम भवन इमारत, २५, मर्झबान पथ,**
**फोर्ट, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक: २६ नोव्हेंबर, २०१४**

**वाचा :-**१. सामान्य प्रशासन विभागाचे परिपत्रक क्रमांक :- एफएलजी १२०७/प्र.क्र.११/०७/३० दि. २३.०८.२००७
२. ग्राम विकास व जलसंधारण विभागाचे परिपत्रक क्रमांक - रिटपी २६१३/प्र.क्र.८६/पंरा-४ दि. ०९.०४.२०१३

**प्रस्तावना:-**

हिंदु जन जागृती समितीने मा. उच्च न्यायालयात जनहित याचिका क्रमांक १०३/२०११ दाखल केली आहे. सदरहु याचिकेत प्लॅस्टिक तसेच कागदांचे राष्ट्रीय ध्वज विक्री करणे, खरेदी करणे, त्यांचा वापर करणे यावर बंदी आणण्याची मा. उच्च न्यायालयास विनंती केलेली आहे. प्रस्तुत याचिकेच्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालयाने राष्ट्रध्वजाचा अवमान होवू नये म्हणून शासन स्तरावरावरुन राष्ट्रध्वजा संदर्भातील विविध मुद्याबाबत क्षेत्रीय स्तरावर अधिकाऱ्यांना या संदर्भात मार्गदर्शक सूचना देण्याचे आदेश दिनांक २९ सप्टेंबर, २०१४ रोजी दिलेले आहेत. या अनुषंगाने क्षेत्रीय स्तरावरील अधिकाऱ्यांना राष्ट्रध्वजाच्या ध्वज संहितेचे काटेकोर पालन करण्याबाबत आदेश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**परिपत्रक:-**

मा. उच्च न्यायालयात जनहित याचिका क्रमांक १०३/२०११ प्रकरणी सुनावणी चालू असताना सदर याचिकेतील नमूद बाबी संदर्भात ग्रामविकास विभागाने दिनांक ०९ एप्रिल, २०१३ रोजी क्षेत्रीय स्तरावरील अधिकाऱ्यांना ग्रामपंचायतीच्या हद्दीत / जिल्हा परिषदेच्या हद्दीत राष्ट्रध्वजाबाबत घ्यावयाच्या काळजी संदर्भात परिपत्रक जारी केले होते. प्रस्तुत प्रकरणी मा. उच्च न्यायालयाने दिनांक २९ सप्टेंबर, २०१४ रोजी पारीत केलेल्या आदेशात दिनांक ०४ ऑगस्ट, २०१४ रोजी पारीत केलेल्या आदेशात दिलेल्या मार्गदर्शक मुद्यांव्यतिरीक्त आणखी नवीन मार्गदर्शक मुद्दे दिले आहेत. त्या अनुषंगाने असे सूचित करण्यात येते की, ग्रामपंचायत तसेच जिल्हा परिषदेच्या क्षेत्रात १५ ऑगस्ट, २६ जानेवारी तसेच इतर शासकिय कार्यक्रमात राष्ट्रध्वजाचा वापर करतांना प्लॅस्टिकच्या ध्वजांचा वापर करण्यात येवू नये त्याचप्रमाणे कागदाचे राष्ट्रध्वज वापरावयाचे झाल्यास राष्ट्रीय ध्वज संहितेत नमूद केलेल्या उप कलम (X) चे कलम २.२ मधील नमूद तरतुदीनुसारच वापरण्यात यावे. जिल्हा परिषद / ग्रामपंचायत क्षेत्राच्या हद्दीतील मान्यता प्राप्त शैक्षणिक संस्थांनी ध्वज संहितेचे काटेकोरपणे पालन करावे आणि कोणत्याही परिस्थितीत प्लॅस्टिकच्या राष्ट्रध्वजाचा वापर करु नये. जिल्हा परिषद आणि ग्रामपंचायतींनी या परिपत्रकाची मोठ्या आणि व्यापक प्रमाणात प्रसिध्दी करावी. त्याचप्रमाणे जिल्हा परिषदेने प्रत्येक वर्षी १५ ऑगस्ट आणि २६ जानेवारी पुर्वी स्थानिक मराठी आणि हिंदी भाषिक वर्तमान पत्रामध्ये त्याचप्रमाणे विविध वाहीन्यांमध्ये या संदर्भातील जाहिरात प्रसिध्दीस

द्यावी. रस्त्यावर सापडलेले प्लॅस्टिकचे / कागदाचे राष्ट्रध्वज खराब झालेले आढळल्यास त्याचे संकलन करणेबाबत सर्व लोकांना ग्रामपंचायत / जिल्हा परिषदेने आवाहन करावे व असे खराब झालेले राष्ट्रध्वज ग्रामपंचायत स्तरावर ग्रामसेवकाने, पंचायत स्तरावर विस्तार अधिकाऱ्याने व जिल्हा परिषद स्तरावर कार्यालयीन अधिक्षक यांनी संकलित करावे. हे राष्ट्रध्वज ध्वजसंहितेतील तरतुदीनुसार नष्ट करण्यात यावेत. ही सुविधा उपलब्ध असल्याबाबत सर्व निमशासकिय संस्था, शासकिय संस्था, स्थानिक प्राधिकरण, शैक्षणिक संस्था व इतर स्थानिक सामाजिक संस्था यांना अवगत करण्यात यावे. याबाबत असेही सूचित करण्यात येते की, सरकारी संस्था नसलेल्या व याचिकाकर्ता संस्था तसेच इतर संस्था रस्त्यावर पडलेले राष्ट्रध्वज गोळा करुन ग्रामपंचायत / पंचायत / जिल्हा परिषद स्तरावरील उपरोक्त नमूद प्राधिकाऱ्यांकडे राष्ट्रध्वज जमा करु शकतात.

राष्ट्रध्वजाचा योग्य मान राखला जावा त्याचा अवमान होवू नये याकरीता या परिपत्रकात नमुद केलेल्या बाबींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच जाणिवपुर्वक राष्ट्रध्वजाचा अवमान करण्याचा प्रयत्न केल्यास राष्ट्रीय प्रतिबंध कायदा १९७१ चे कलम २ अनुसार तात्काळ कारवाई करण्यात यावी.

हे शासन परिपत्रक शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणकीय संकेतांक २०१४११२७१०२१५५०१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Krishna Mukund Koyande

Digitally signed by Krishna Mukund Koyande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Krishna Mukund Koyande
Date: 2014.11.27 10:32:00 +05'30'

**(कृष्णा कोयंडे)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव
३. मा. मंत्री ग्रामविकास यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री ग्रामविकास यांचे खाजगी सचिव
५. मा. मंत्री, मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व)
६. विधान सभा / विधान परिषद सदस्य (सर्व)
७. मा. मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय मुंबई - ३२
८. अप्पर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय मुंबई-३२
९. पोलिस महासंचालक महाराष्ट्र राज्य मुंबई
१०.सर्व प्रधान सचिव / सर्व सचिव मंत्रालय मुंबई
११.मुख्य राजशिष्टाचार अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय मुंबई-३२

१२.आयुक्त, बृहन्मुंबई महानगर पालिका मुंबई

१३.सचिव, विधान मंडळ सचिवालय, विधान भवन मुंबई

१४.सर्व विभागीय आयुक्त

१५.प्रबंधक, मुळ शाखा, उच्च न्यायालय मुंबई (पत्राने)

१६.प्रबंधक, अपिल शाखा, उच्च न्यायालय मुंबई (पत्राने)

१७.पोलिस आयुक्त, मुंबई, पुणे, ठाणे, नागपूर, नाशिक व औरंगाबाद

१८. सर्व पोलिस उप महानिरीक्षक ,

१९.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मूंबई

२०.सर्व जिल्हाधिकारी

२१.सर्व जिल्हा पोलिस अधिक्षक

२२.महालेखापाल - १ महाराष्ट्र राज्य मुंबई

२३.महालेखापाल - २ महाराष्ट्र राज्य नागपूर

२४.आयुक्त, महानगर पालिका पुणे, नागपूर, कोल्हापूर, सोलापूर, ठाणे, कल्याण, अमरावती, औरंगाबाद, नाशिक, पिंपरी चिंचवड

२५.सर्व जिल्हा परिषदांची मुख्य कार्यकारी अधिकारी

२६.सर्व नगर परिषदांचे अध्यक्ष